(293) 20150622170759827

**अंबित लघु पाटबंधारे योजना ता. अकोले जि.अहमदनगर या योजनेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक लपात २००६/(प्र.क्र.४४५/२००६)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१५.०२.२००८

पहावे :- मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे पत्र क्रमांक उमप्र/तां-३/२८७९/सन २००६, दिनांक ११.८.२००६.

अंबित लघु पाटबंधारे योजना ता,अकोले, जि.अहमदनगर या योजनेस शासन निर्णय क्रमांक लपात-२००१/२०७६/(६७६/२००१)/खारभूमी, दिनांक ३.५.२००२ अन्वये रुपये ९,९४,२६,८९७/- किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. या योजनेचे काम, अनुषंगिक कामे फेब्रुवारी १९९४ पासून सुरु करण्यात आले व प्रमुख कामे ब-१ निविदेअंतर्गत डिसेंबर १९९४ पासून सुप्त असून आजमितीस प्रकल्पाचे बहुतांशी काम पुर्ण होत आले आहे. दरसूचीच्या दरातील वाढ, भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ, कामाच्या परिमाणातील वाढ, गौण खनिज स्वामित्व शुल्क व इतर कारणामुळे योजनेच्या किंमतीत वाढ अपेक्षित असल्याने सन २००५-०६ च्या दरावर आधारित रुपये १४,०६,१०,३९३/- किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्याकडून प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंबंधात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये अंबित लघु पाटबंधारे योजना ता.अकोले, जि.अहमदनगर या योजनेस सन २००५-०६ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रु.१४,०६,१०,३९३/- (रुपये चौदा कोटी, सहा लक्ष, दहा हजार, तीनशे त्र्याण्णव फक्त) यापैकी रुपये ११,३५,१८,४९३/- कामाप्रित्यर्थ व रुपये २,७०,९१,९००/- अनुषंगिक खर्च इतक्या रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यतेचे किंमतीत काम पूर्ण होईल या धारणेवर व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये देण्यात आलेला आहे.

C:\Documents and Settings\hp231773\My Documents\Madhuri-Kharland.doc

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक मुख्य लेखाशिर्ष ४७०२ लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (४) महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत (संगणक संकेतांक क्रमांक ४७०२-४९९-२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व चालू आर्थिक वर्षात गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाकडे उपलब्ध होणा-या तरतुदीतुन परस्पर भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय शा. नि. क्रमांक संकीर्ण १०९९/(१२९/९९)/मोप्र(प्र), दिनांक १८.५.१९९९ मधील "अ" नुसार आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता ( ४ /०८) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रा. च. हुमणे )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता),१/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा परिक्षा) १/२, मुंबई/नागपूर,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक,
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर,
अवर सचिव, खारभूमी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अर्थसंकल्प शाखा (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
जिल्हाधिकारी, अहमदनगर,
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क संचालनालय , मंत्रालय, मुंबई (२ प्रती),
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२,
खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)

(21)

शासन निर्णय क्रमांक लपात-२००६/प्र.क्र.४४५/२००६/खारभूमी, दिनांक १५.०२.२००८ चे
परिशिष्ट
अंबित लघु पाटबंधारे योजना ता.अकोले, जि अहमदनगर अंदाजपत्रकाचा गोषवारा.

| क्रमांक | शिर्ष/उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | एकूण रुपयात |
|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | |
| १) | 'ए' प्राथमिक | ६,००,००० | ६,००,००० |
| २) | 'बी' (भूसंपादने) | ६२,२५,८३८ | ६२,२५,८३८ |
| ३) | 'सी' बांधकामे | ९,९९,००,८३४ | ९,९९,००,८३४ |
| ४) | 'डी' विमोचक | ३०,८३,५०३ | ३०,८३,५०३ |
| ५) | ई-प्रपात | - | - |
| ६) | एफ रिव्हर आणि टोरंट कामे | - | - |
| ७) | जी पूल | - | - |
| ८) | एच एस्केप | - | - |
| ९) | 'के' इमारती | ८,१६,२९० | ८,१६,२९० |
| १०) | एल मातीकाम | - | - |
| ११) | एम वृक्षारोपन | २५,००० | २५,००० |
| १२) | 'ओ' संकीर्ण | २५,००० | २५,००० |
| १३) | 'पी' देखभाल | ८,५६,५०० | ८,५६,५०० |
| १४) | 'आर' दळणवळण | १९,८७,५२८ | १९,८७,५२८ |
| १५) | वितरिका | - | - |
| | **एकूण** | **११,३१,१८,४९३** | **११,३१,१८,४९३** |
| | अनुषंगिक खर्च (२५.२५ टक्के भूसंपादन व रॉयल्टी फी वगळून) | २,७०,९१,९०० | २,७०,९१,९०० |
| | **योजनेची एकूण किंमत** | **१४,०६,१०,३९३** | **१४,०६,१०,३९३** |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ९७३ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ५४६० सघमी |
| पाणीसाठयाची प्र.स.घ.मी.किमत (रु.) लाभव्यय गुणोत्तर | २५७५३ < ३२६८४ (आर्थिक मापदंडात बसते)<br>१.९७ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते) |

C:\Documents and Settings\hp231773\My Documents\Madhuri-Kharland.doc